**सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजना अंतर्गत कामास मुळ प्रशासकीय मान्यता दिल्यानंतर कामाच्या व्याप्तीत वाढ झाल्यास मुळ प्रशासकीय मान्यतेपेक्षा येणा-या वाढीव खर्चाच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः डिएपी- १०१३/ प्र.क्र. ६५/ का. १४८१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २१ ऑगस्ट, २०१४

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकः** नियोजन विभाग, जिवायो-१००७/ प्र.क्र.३९/ का.१४४४, दि.१६/२/२००८.

परिपत्रक -

सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनेचा निधी अर्थसंकल्पीत करणे, वितरीत करणे व या निधीतील कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबतची सुधारीत कार्यपध्दती संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णय, नियोजन विभाग, दि. १६/२/२००८ च्या परिच्छेद क्र.३ (३.१ ते ३.४ येथे) विहित करण्यात आली आहे. तथापि, वारंवार शासनाच्या असे निदर्शनास येत आहे की, जिल्हा वार्षिक योजनेतील कामांना जिल्हाधिकारी यांनी मुळ प्रशासकीय मान्यता दिल्यावर अल्पावधीतच सदर कामाच्या व्याप्तीत वाढ करून अथवा कामात वाढ झाल्याचे दाखवुन, तसेच कामाच्या परिमाणात वाढ झाल्याचे अथवा वाढीव दराची निविदा स्विकारल्याची इत्यादी कारणे पुढे करून अशा कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यतेपेक्षा येणा-या वाढीव खर्चाच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रस्ताव शासनास सादर करण्यात येतात. बरेच वेळा शासनाच्या असेही निदर्शनास आले की, कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यतेपेक्षा वाढीव खर्चास सुधारीत प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेली नसतानाही काम पूर्ण करून घेण्यात येते व काम पूर्ण झाल्याने ठेकेदाराचे देयक अदा करता यावे म्हणून सादर केलेल्या सुधारीत प्रशासकीय मान्यतेबाबतच्या प्रस्तावाबाबत शासनाकडे पाठपुरावा करण्यात येतो.

२. वरील पार्श्वभूमीवर, शासनाने अशा प्रकारच्या अनियमीततांची गंभीर दखल घेतली असून या परिपत्रकाव्दारे सर्व संबंधीतांना असे सूचित करण्यात येते की, सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजने अंतर्गत कामास जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मान्यता दिल्यावर, कालांतराने कामाच्या व्याप्तीत वाढ झाल्यास किंवा कामाच्या परिमाणात वाढ झाल्यास अथवा वाढीव दराची निविदा स्विकारली असल्यास,

अशा कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यतेपेक्षा येणा-या वाढीव खर्चाच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रस्तावित करताना संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णय, नियोजन विभाग, दि. १६/२/२००८ च्या परिच्छेद क्र.३ (३.१ ते ३.४ येथे) मधील विहित कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी. तसेच कामाच्या मुळ प्रशासकीय मान्यतेपेक्षा वाढीव खर्चास विधीवत सुधारीत प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेली नसताना काम पूर्ण करून घेण्यात येऊ नये, या सचूनांचे पालन कटाक्षाने करण्यात यावे. भविष्यात या सूचनांचे उल्लंघन झाल्याचे निदर्शनास आल्यास, संबंधितांविरूध्द जबाबदारी निश्चित करून (अत्यंत अपवादात्मक प्रकरणे सोडून) त्यांचे विरूध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल, याची नोंद सर्व संबंधितांना कृपया घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११२०९११९९१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Thatte Gopal P

Digitally signed by Thatte Gopal P
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Thatte Gopal P
Date: 2014.08.21 15:54:54 +05'30'

**(गो.पु.थत्ते)**
कार्यासन अधिकारी, नियोजन विभाग.

**प्रत,**

१.जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, (सर्व).
२. उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, (सर्व).
३. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, (सर्व).
४. महालेखापाल, महाराष्ट्र १ व २, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई व नागपूर
६. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व).
७. सार्वजनिक बांधकाम विभाग (रस्ते-५), मंत्रालय, मुंबई -३२.
८. वित्त विभाग, व्यय-८व अर्थ- १६, मंत्रालय, मुंबई -३२.
९. निवड नस्ती, का. १४८१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.